राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियानांतर्गत शासकीय निजामकालीन जुन्या व मोडकळीस आलेल्या शाळांच्या वर्गखोल्या दुरुस्ती व पुनर्बांधणीसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-११२१/प्र.क्र.२८२/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०४ फेब्रुवारी, २०२२

वाचा : (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.सादिल-२०२१/प्र.क.१०१/एसमएम-४, दिनांक ९ सप्टेंबर, २०२१.
(२) शासन निर्णय क्रमांक शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकिर्ण-११२१/प्र.क्र.२८२/एसएम-१, दिनांक १६ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांतील वर्गांची पुनर्बाधणी तसेच शाळांची दुरुस्ती करण्यासाठी राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियानांतर्गत प्रथम टप्प्यात मराठवाडयातील विभागातील निजामकालीन स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांच्या दुरुस्ती/ पुनर्बांधणी करण्याचे प्रस्तावित आहे. संदर्भ क्र.१ अन्वये सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने प्राधान्यक्रम निश्चित करता, मराठवाडा विभागातील शाळांमध्ये मोडकळीस आलेल्या वर्गखोल्यांची पुनर्बांधणी व दुरुस्तीची कामे तातडीने करण्यासाठी संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयान्वये रु.१२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियानांतर्गत मराठवाडयातील निजामकालीन जुन्या व मोडकळीस आलेल्या शाळांच्या वर्गखोल्या दुरुस्ती व पुनर्बांधणीसाठी उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियानांतर्गत मराठवाडयातील निजामकालीन जुन्या व मोडकळीस आलेल्या शाळांच्या वर्गखोल्या दुरुस्ती व पुनर्बांधणीसाठी रु.८०.०० कोटी (रुपये ऐंशी कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर बांधकामे करण्यासाठी सर्व शिक्षा अभियानाच्या (महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद) यंत्रणेचा वापर करण्यात यावा.

२. याकरिता होणारा खर्च '२२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य,(०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन

अनुदाने (२२०२०१७३)' या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) प्राथमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६१/२०२२/व्यय-५, दिनांक २०/०१/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०४११२१५५६८२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, pseudonym=8A56BA47E80DB19230A0A19F1AC94146E6B7B8A8, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2022.02.04 11:23:08 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई.
६) अवर सचिव (अर्थसंकल्प)), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी (एमएम-४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
९) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
१०) निवडनस्ती/एसएम-१ कार्यासन.